उप विभागीय अधिकारी या पदावरुन कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नती / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१११७/ प्र.क्र. १३६ (३६) / सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०४ सप्टेंबर, २०१७

**पहा :** शासन निर्णय,पाटबंधारे आणि वीज विभाग क्र.जीएबी-१०७०-ई (१), दिनांक १९.१२.१९७०

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या संवर्गातील **अ.जा.** प्रवर्गातील श्री.कमलाकर शशीकुमार शिवदास, कृषी बांधकाम उपविभाग क्र.१, आरे, गोरेगांव (पू.) मुंबई यांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पी.बी.-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ६६००/- या वेतनश्रेणीत निवडसूचीच्या क्रमानुसार तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग, रायगड, अलिबाग या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. शिवदास, उप विभागीय अधिकारी यांची सदर पदोन्नती, पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :

१) वरील पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ (महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर) तसेच इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणांमध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नतीमुळे सेवाज्येष्ठता व अनुषंगिक बाबींसाठी हक्क राहणार नाही.

३) आरक्षण अधिनियम, २००१ विरुध्द महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल याचिका क्रमांक टी-१/२०१४ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून.

३. श्री. शिवदास यांनी पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

४. श्री. शिवदास यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

५. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी त्यांच्याशी संबधित अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, पदोन्नत अभियंत्यास पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

६. श्री. शिवदास यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. तसेच, त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक सीडीआर-१०८९/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन पदोन्नतीने नियुक्ती रद्द करण्यासाठी पदस्थापनेत बदल करण्यासाठी त्यांनी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

७. श्री. शिवदास यांचे लक्ष शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही-१०८७/ ११३१/ प्र.क्र.११-८९/बारा, दिनांक ३० एप्रिल, १९९१ कडे वेधण्यात येत आहे. नियुक्तीच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर न झाल्यास सदर परिपत्रकातील तरतुदीनुसार त्यांचेविरुध्द कारवाई करण्यात येईल, याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

८. श्री. शिवदास यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

९. श्री. शिवदास यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०४१६५४१२०८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b989f11a955bd12836202040b21122502b1ac600cf24865b3b7d7169e14596c4, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.09.04 19:00:47 +05'30'

**(मृ.सं.देशपांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड (अलिबाग),
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर/विशेष प्रकल्प, मुंबई /राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
७. श्री. कमलाकर शशीकुमार शिवदास, उप विभा. अधि., कृषी बांधकाम, उपविभाग क्र.१, आरे, गोरेगाव (पू.) मुंबई,
८. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,

९. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड,
१३. सामान्य प्रशासन विभाग, का.-१२/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१७. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१८. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१९. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२०. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. निवडनस्ती.